महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय
मंजूरी देण्यात आलेल्या नागरी पाणी पुरवठा व
मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
डहाणू नगर परिषद, जि. पालघर

महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र.९३/पापु.२२**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २८ डिसेंबर, २०२१

वाचा :

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि.२२.१०.२००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
३) मुख्य अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ. (प्र.व्य.स.से.) /तांशा १/१३८, दि.२७.०१.२०१४
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.४०/पापु-२२, दि.१०.०२.२०१४
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.९३/पापु-२२, दि.४.०३.२०१४
६) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.९३/पापु-२२, दि.१२.०९.२०१४
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.९३/पापु-२२, दि.११.०२.२०१५
८) मुख्याधिकारी डहाणू नगर परिषद, जि.पालघर यांचे पत्र क्र.डनप/२३०२/२०२१-२२, दि.१५.१२.२०२१.
९) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१

<u>प्रस्तावना</u> :

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासन निर्णय, दि.१०.०२.२०१४ अन्वये डहाणू शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.३०,०६,१०,०००/- इतक्या किमतीच्या भांडवली कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. डहाणू ही “ क ” वर्ग नगर परिषद आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.२७,०५,४९,०००/- इतके अनुदान (९०%) अनुज्ञेय असून डहाणू नगर परिषदेच्या स्वहिश्श्याची (१०%) रक्कम रु.३,००,६१,०००/- आहे. मुख्य अभियंता, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे विभाग पुणे यांनी दि.२७.०१.२०१४ च्या पत्रान्वये डहाणू शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.२८,०९,४३,६८१/- इतक्या निव्वळ व रु.३०,०६,१०,०००/- इतक्या ढोबळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली आहे. डहाणू नगर परिषदेने स्वहिश्श्याची (१०%) रक्कम रु.३,००,६१,०००/- संबंधित बँक खात्यामध्ये जमा केलेली आहे. सदर योजनेकरीता अनुज्ञेय अनुदानापैकी यापूर्वी शासन निर्णय, दि.४.०३.२०१४ अन्वये रु.८,९९,००,०००/-, शासन निर्णय, दि.१२.०९.२०१४ अन्वये रु.९,००,९६,०००/- व दि.११.०२.२०१५ अन्वये रु.६,३४,९९,०००/- असे मिळून एकूण रु.२४,३४,९५,०००/- इतके अनुदान डहाणू नगर परिषदेस वितरीत करण्यात आलेले आहे. मुख्याधिकारी, डहाणू नगर परिषद यांनी दि.१५.१२.२०२१ च्या पत्रान्वये एकूण रु.३३,६४,९२,३३०/- इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच सदर योजनेवर होणा-या जादा खर्चासाठीची रु.६,९८,००,०००/- ची तरतूद १४ व्या वित्त आयोगाकडून उपलब्ध करुन घेतली असून उर्वरित निधी नगर परिषदेने स्वत: जमा केला असल्याचे नमूद केले आहे. मुख्याधिकारी, डहाणू नगर परिषद यांनी दि.२६.०९.२०१९ च्या पत्रान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून प्राप्त झालेला डहाणू शहर पाणी पुरवठा योजनेतील मंजूर कामांपैकी एकूण ८७% कामे पूर्ण झाली असल्याबाबतचा भौतिक प्रगती अहवाल सादर केलेला आहे. तसेच दि.१६.०३.२०२१ च्या पत्रान्वये सदर योजनेवर होणा-या खर्चाचे Overall Excess /Saving Statement सादर केले असून त्यामध्ये रु.७,९३,०२,०००/- इतका जादा खर्च होणार असल्याचे नमूद केले आहे. सदर योजनेस यापूर्वी रु.२४,३४,९५,०००/- इतके अनुदान वितरीत करण्यात आले असून, उर्वरित रु.२,७०,५४,००० इतके अनुदान डहाणू नगर परिषदेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी क्षेत्रातील नगरपालिकांच्या ( स्थानिक संस्था ) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान, या कार्यक्रमाखालील महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान योजनांचे कार्यान्वयन राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांचेकडून करण्यात येते.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.१०.०२.२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या डहाणू शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांकरिता अनुज्ञेय अनुदानापैकी रु.२,७०,५४,०००/- (रुपये दोन कोटी सत्तर लाख चौपन्न हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार नागरी पाणी पुरवठा योजनांच्या कार्यान्वयनाकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात, मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता १९२, महानगरपालिका / नगरपरिषदांना सहाय्य (०२) नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता-(०२) (०२) नगरपालिकांच्या /नगरपरिषदांच्या पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), २२१५ १६४७ या कार्यक्रमाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई यांना या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे. वितरीत वाटप खालील विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आले आहे.

**(रक्कम रुपयात)**

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| डहाणू, जि.पालघर | ३०,०६,१०,००० | २७,०५,४९,००० | ३,००,६१,००० | ३,००,६१,००० | २४,३४,९५,००० | २,७०,५४,००० |
| | | | | | **एकुण रुपये** | **२,७०,५४,०००** |

- सदर अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत. शासनाच्या निदेशानुसार सदर अनुदान नागरी संस्थांना वितरीत करण्यात यावे.
- अनुदानाची रक्कम ज्याकरीता वितरीत करण्यात आली आहे, त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दि.३१ मार्च, २०२२ पर्यंत खर्च करावी.
- या वितरीत अनुदानातून होणा-या वाटपाची माहिती राज्य पाणी व स्वच्छता मिशन या संस्थेने शासनाला कळवावी.
- मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील जोडपत्र-२ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार प्राधिकरणाचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशन या संस्थेने महालेखापालांना सादर करावेत.
- राज्य पाणी व स्वच्छता मिशनला शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत किंवा जी अनुदाने यापुढील कालावधीत प्राप्त होतील त्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांनी उपयोगिता प्रमाणपत्रात दर्शविलेल्या वितरीत अनुदानाच्या व खर्चाच्या

कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. त्या उपयोगिता प्रमाणपत्रावर उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी करावी, अशी प्रमाणपत्रे शासनाला स्विकारार्ह होतील.

- सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात शासनाला सादर करावे तसेच उपयोगिता प्रमाणपत्रांच्या प्रती महालेखापालांनाही पाठवाव्यात.
- सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा आणि विहित अहवाल विहित दिनांकास, लेखा अधिकारी, पापु-२० पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१ यांच्याकडे सादर करावा.
- या शासन निर्णयान्वये संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. हा निधी उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. रविंद्र शिंदे, संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांना तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून श्री.वसंत माने, उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांनी या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेली रक्कम उपकोषागार कार्यालय, कोकणभवन, नवी मुंबई यांचे कार्यालयातून आहरित करुन सदर रक्कम ही एनईएफटी (NEFT ) प्रणालीद्वारे पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या वितरीत केलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १९२, महानगरपालिका / नगरपरिषदांना सहाय्य, (०२) नागरी पाणी पुरवठा व स्वच्छता, (०२) (०२) नगरपालिकांच्या / नगरपरिषदांच्या पाणीपुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर), २२१५ १६४७ या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१ मधील अटी तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ मधील प्रत्येक अटींची पूर्तता झालेली आहे.

५. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तीका,१९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.५ परिच्छेद क्रमांक २७ (२) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२११२२८१३२०५७२१२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VARSHA GUNVANTRAO DESHMUKH

Digitally signed by VARSHA GUNVANTRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, pseudonym=F95102CD8311B72DFCBECFA350FF3EF7BE95A559, serialNumber=B030780A012E3648CB356030F4D4BFD6DCFED5E1526059A46C087A14FE3C29A0, cn=VARSHA GUNVANTRAO DESHMUKH
Date: 2021.12.28 14:10:08 +05'30'

**( वर्षा देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) ओल्ड सी.जी.ओ.इमारत, न्यु मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
- महालेखापाल, महाराष्ट्र-२, ( लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हील लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर-४४० ००१.
- विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
- महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. ( ५ प्रतीसह )
- आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई-३०.
- जिल्हाधिकारी, पालघर.
- नियंत्रक अधिकारी तथा उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
- आहरण व संवितरण अधिकारी तथा संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४. ( ५ प्रतीसह )
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर
- जिल्हा कोषागार अधिकारी, जि.पालघर
- मुख्याधिकारी, डहाणू नगर परिषद, जि. पालघर

- उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४.
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती, पापु-२२.